**राज्यातील प्रत्येक तालुक्यात उभारण्यात यावयाच्या स्मार्ट प्राथमिक आरोग्य केंद्र, पी एम श्री शाळा, ग्रामपंचायत व अंगणवाडी यासाठी नोडल डिपार्टमेंट नियुक्त करणे**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- डिएपी-१०२४/प्र.क्र.५७/का.१४८१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक- १२ मार्च, २०२४

**प्रस्तावना** -

मा.पंतप्रधानांनी मुख्य सचिवांच्या तृतीय राष्ट्रीय परिषदेत **"राहणीमान सुलभतेस उत्तेजन"** या मुख्य संकल्पनेअंतर्गत **"आरोग्य व कल्याण"** तसेच **"शिक्षण"** या उप संकल्पनेअंतर्गत राज्यांना मार्गदर्शन केले आहे. त्यामध्ये नागरिकांचे राहणीमान सुलभ करणे व त्यांना दर्जेदार आरोग्य तसेच शिक्षण विषयक सुविधा उपलब्ध करुन देणे यावर भर देण्यात आला आहे. त्यानुसार राज्यातील नागरिकांना दर्जेदार आरोग्य विषयक सुविधा तसेच शालेय मुलांना शिक्षणाबरोबरच समान सोयी उपलब्ध व्हाव्यात या हेतूने राज्यातील प्रत्येक तालुक्यात स्मार्ट प्राथमिक आरोग्य केंद्र, पी एम श्री शाळा, अंगणवाडी तसेच ग्रामपंचायत भवन उभारण्याचे शासनाचे विचाराधीन होते. त्यास अनुसरुन शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** -

राज्यातील नागरिकांना उत्तम दर्जाच्या आरोग्य विषयक सुविधा, प्राथमिक शाळेतील विद्यार्थ्यांना दर्जेदार शिक्षण व साहित्य तसेच लहान बालकांना सोयी सुविधा उपलब्ध होण्यासाठी राज्यातील प्रत्येक तालुक्यात स्मार्ट प्राथमिक आरोग्य केंद्र, पी एम श्री शाळा, अंगणवाडी व ग्रामपंचायत भवन उभारण्यात येणार आहे. सदर सुविधांसाठी राज्य योजनांमधून तसेच जिल्हा वार्षिक योजनेतून निधी देण्यात येणार आहे. या सोयी सुविधांची प्रभावी अंमलबजावणी करण्याकरीता नोडल डिपार्टमेंट म्हणून ग्राम विकास विभागाची नियुक्ती करण्यात येत आहे. त्याकरीता ग्राम विकास विभागामार्फत खालील कामे पार पाडण्यात येतील.

अ) राज्यातील प्रत्येक तालुक्यात उभारावयाच्या आदर्श शाळा, आदर्श प्राथमिक आरोग्य केंद्र याचा टाईप प्लॅन व त्यातील सोयीसुविधा केंद्र शासनाच्या पी एम श्री शाळा आणि आयुष्यमान आरोग्य केंद्र याच्या धर्तीवर समान असतील याची खात्री करणे. तसेच अंगणवाडी व ग्रामपंचायत याचाही टाईप प्लॅन तयार करावा.

ब) आदर्श शाळा, प्राथमिक आरोग्य केंद्र, अंगणवाडी व ग्रामपंचायत बांधकामासाठी केंद्र व राज्य योजनांमधून अभिसरणाव्दारे तसेच जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण), १५ वा वित्त आयोग

इ. मधून निधी उपलब्ध करुन देणे, तसेच विविध मंत्रालयीन विभागांमध्ये समन्वय साधून सदरहू बांधकामांमध्ये येणाऱ्या अडचणी दूर करणे

क) सदरहू कामे दोन वर्ष कालावधीत कालबध्द कार्यक्रम आखून अभियान स्वरुपात पुर्ण करणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संगणक संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०३१३११४९४९२०१६ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

NITIN BHANUDAS KHEDKAR

Digitally signed by NITIN BHANUDAS KHEDKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=99977b58556463dbb2db463cec9482d13f7661ed3b2a95e83e386485fff4c21e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=CFCA827F49093860DB8AA4627DA10E31F82BD40A9631D2E01EC212A473A6BCA2, cn=NITIN BHANUDAS KHEDKAR
Date: 2024.03.13 11:58:54 +05'30'

**( नितिन खेडकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्य सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२) अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३) अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
६) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
८) विभागीय आयुक्त, विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व)
९) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती (सर्व)
१०) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व)
११) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हा नियोजन समिती (सर्व)
१२) निवड नस्ती, का.१४८१.